# हरवलेला कुत्रा

## बाल्टिक नावाच्या एका शूर कुत्र्याची खरी गोष्ट

लेखिका: **मोनिका कारनेसी**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**



# हरवलेला कुत्रा

## बाल्टिक नावाच्या एका शूर कुत्र्याची खरी गोष्ट

लेखिका: **मोनिका कारनेसी**

अनुवाद: **सुजाता गोडबोले**





हे पुस्तक आर/व्ही  बाल्टिक या बोटीवरील
सर्व अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना
त्यांच्या शौर्यासाठी  आणि सहानुभूतीसाठी
अर्पण

अतिशय तीव्र हिवाळ्यातील एका अति  थंड दिवशी विस्तुला नदीतून बर्फाचे मोठाले तुकडे तरंगत बाल्टिक समुद्राकडे जात होते.

पाण्यात काही तरी हलताना दिसते आहे.

काय बरे असेल?

एखादा पक्षी आहे का?

नाही.

मासा?

नाही.

हा तर कुत्रा दिसतोय!



हा तर एक छोटासा कुत्रा बर्फावरून तरंगत निघाला आहे!

“कोणीतरी मदतीला येईल का?

कोणीतरी या कुत्र्याला मदत करा!”

आग विझवणाऱ्या दलाचे लोक मदतीला आले.

कुत्र्यापर्यंत पोचण्यासाठी

ते नदीत उतरले.

पण नदी खूप वेगाने वाहत होती.

आणि हा छोटासा कुत्रा प्रवाहाबरोबर वाहत गेला.

वाहत वाहत कुत्रा लोकांसमोरून आणि इमारतींच्या पलीकडे

दूरवर निघून गेला.





रात्र झाली. रात्र संपून दिवसही उजाडला.







कुत्र्याच्या अंगावरील केसांमुळे त्याच्या अंगातील  ऊब टिकून राहिली होती.

पण तो ओला झाला होता आणि त्याला भूकही लागली होती.

शिवाय तो घाबरलेला होता.



कुत्र्या, भिऊ नकोस!

एक जहाज येत आहे!

जहाजावरील लोकांना बर्फावर काहीतरी दिसले.

हा एक सील असेल का?

नाही.

त्याला चार पाय आहेत, कान आणि शेपटी पण आहे.



“हा तर कुत्रा दिसतो आहे! चला, आपण त्याला मदत करूया!”




जहाजावरच्या लोकांनी एका मोठा बांबू घेऊन त्याला एक जाळे लावले.

कुत्र्या, यात उडी मार!

पण कुत्रा घसरला

आणि पाण्यात पडला.







आता दिसतोय तर खरा!

कुत्रा परत एक तरंगणाऱ्या बर्फाच्या तुकड्यावर चढला.

जहाजावरच्या खलाशांनी एका लहानशी बोट त्या बर्फासारख्या थंड पाण्यात सोडली.

एक खलाशी त्या बोटीतून वल्हे मारत कुत्र्याकडे जाऊ लागला.

तो कुत्र्याच्या जवळ येऊ लागला.

आणखी जवळ.

आणि मग ...



त्याने कुत्र्याला उचलून वाचवले.

“लवकर टॉवेल आणा!

ब्लँकेट आणा!”

बोटीवरील सर्वांनी कुत्र्याला वाचवायला मदत केली.

कुत्रा आता बरा आहे का?



तो खूपच अशक्त झाला आहे आणि दमला पण आहे. त्याला हलता देखील येत नाही.

कुत्र्याला ऊब मिळाली.

आता त्याचे केसही वाळले आहेत.



त्याने  थोडेसे खाल्ले आणि तो परत झोपला. बोटीवर त्याला सुरक्षित वाटते आहे.

कुत्रा जेव्हा जागा झाला,
तेव्हा तो त्याला वाचवणाऱ्या लोकांना शोधू
लागला.



ते नाश्ता करत होते.

कुत्रा जागा झालेला पाहून
सगळे खुश झाले.

त्यांनी कुत्र्याला त्याच्या
आवडीचा खाऊ दिला.

आपल्याला पाण्यातून बाहेर काढणारा माणूस कुत्र्याने शोधून काढला.

त्याने आपले नाक त्याच्या मांडीवर टेकले.



ती त्याची आभार मानण्याची तऱ्हा होती.

“अरे राहू दे!

बाल्टिक, आम्ही तुझे स्वागत करतो!

मग ठरलं तर! आजपासून ‘बाल्टिक’ हेच तुझं नाव!”



अशा तऱ्हेने एका शूर कुत्र्याला नाव मिळाले
आणि नवे घरही!

बाल्टिक, आता तू आमच्यातला एक
झाला आहेस!





तरंगणाऱ्या बर्फावर अडकलेला कुत्रा



इंजीनियर एडम बुक्ज़िन्स्की
बरोबर बाल्टिक

## लेखिकेचे टिप्पण

शनिवारी, २३ जानेवारी २०१० रोजी बाल्टिक समुद्रातील ६० मैल आता असलेल्या डान्सकच्या उपसागरात पोलंडमधील गुडझिड़ गावाजवळच्या विस्तुला नदीत बर्फाच्या मोठ्या तुकड्यावर एक कुत्रा तरंगत असलेला काही मुलांनी पहिला. कुत्रा या बर्फाच्या तुकड्यावर कधी आणि कुठून आला हे कोणालाच माहित नव्हते.

वृत्तपत्रातील बातम्यांनुसार अग्निशामक दलाने त्याला वाचवण्याचा प्रयत्न केला पण त्यांना त्यात यश आले नाही. असंख्य अडचणी असून देखील दोन दिवस हा कुत्रा बर्फावर तरंगत राहिला आणि त्याच्या केसाळ कातडीमुळे तो पोलंडमधील तीव्र थंडीतही जिवंत राहिला. सोमवारी, २५ जानेवारी २०१० रोजी आर/व्ही बाल्टिका या शास्त्रीय संशोधन करणाऱ्या बोटीला तो बाल्टिक समुद्रात किनाऱ्यापासून १५ मैलांवर दिसला.

कुत्र्याला वाचवण्याचे प्रयत्न लगेच सुरु करण्यात आले, पण ते फारच कठीण ठरले. जहाजाच्या हालचालीमुळे बर्फाचे तुकडे सारखे हलू लागले. त्यामुळे हा कुत्रा अनेक वेळा समुद्रात पडला. तो बुडण्यापूर्वी त्याच्यापर्यंत पोचण्यासाठी त्यांनी एक लहानशी बोट समुद्रात उतरवली आणि ऍडम ब्यूकझिन्सकी नावाच्या बोटीवरील अभियंत्याने ती स्वतः चालविली. जहाजावरील खलाशांनी एक मोठी लोखंडी कांब कुत्र्याला वाचवण्यासाठी खाली सोडली. तिच्या सहाय्याने ते तरंगणाऱ्या बर्फातून त्याच्यापर्यंत पोचू शकले.

'बाल्टिक' असे नाव देण्यात आलेल्या या कुत्र्याने लगेच बोटीवरील सर्वांशी मैत्री केली. त्याचा मूळ मालक शोधण्याचे प्रयत्न अपयशी ठरल्यानंतर ब्यूकझिन्सकी यांनी त्याला आपला मानले. आता बाल्टिक हा आर/व्ही बाल्टिका या जहाजाचा अधिकृत सदस्य आहे आणि त्याने अनेक संशोधन मोहिमांत भाग घेतला आहे. समुद्रावर असताना तो बोटीच्या डेकवरून समुद्र आणि समुद्रावरील पक्षी पाहत बसतो.

बाल्टिकची आणि त्याला वाचवण्याच्या मोहिमेची बातमी जगभरात सर्वत्र झळकली.